आदर्श सहकारी गृहनिर्माण संस्थेच्या प्रकरणाशी संबंधीत महत्त्वाची कागदपत्रे सेफ कस्टडीमध्ये ठेवण्याबाबत.

---

# महाराष्ट्र शासन

**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक- विपआ-१०११/प्र.क्र.१/२०११/९**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,**
**दिनांक. ३.९.२०११**

## शासन परिपत्रक -

आदर्श सहकारी गृहनिर्माण संस्थेच्या प्रकरणाशी संबंधीत राज्यशासनाच्या विविध विभागांच्या ताब्यात असलेल्या नस्त्यांमधील महत्वाची कागदपत्रे गहाळ होऊ नयेत म्हणून सदर नस्त्या सेफ कस्टडीमध्ये ठेवणे आवश्यक आहे. त्या अनुषंगाने संबंधित विभाग/कार्यालयांनी पुढीलप्रमाणे कार्यवाही करणेबाबत खालीलप्रमाणे सूचना निर्गमित करण्यात येत आहेत.

१) सर्व संबंधीत विभागांनी / कार्यालयांनी आदर्श सहकारी गृहनिर्माण संस्थेच्या प्रकरणाशी संबंधीत त्यांच्याकडील सर्व नस्त्या / कागदपत्रे स्कॅन करून त्यांची सॉफ्ट कॉपी संबंधीत विभागाच्या सचिवांकडे सोपवावी व मूळ नस्ती पुढील कार्यवाहीसाठी संबंधीत क्रार्यासनाकडेच ठेवावी. मात्र सदर नस्त्या बंद कपाटामध्ये सुरक्षित ठेवाव्यात.

२) सदर नस्त्यांमधील आतापर्यंतच्या सर्व कागदपत्रांच्या छायांकीत प्रती संबंधीत कार्यासनाचे कक्ष अधिकारी/ अवर सचिवांमार्फत साक्षांकीत करून विभागाच्या सचिवांकडे सोपविण्यात याव्यात.

३) याशिवाय सदर नस्त्यांवर यापुढे काही कार्यवाही झाल्यास, पुढील कार्यवाहीमध्ये तयार झालेल्या सर्व अतिरिक्त पृष्ठांच्या (पत्रविभाग तसेच टिप्पणी विभागातील) साक्षांकीत प्रती वेळोवेळी म्हणजेच प्रत्येक महिन्याच्या शेवटच्या तारखेस विभागाच्या सचिवांकडे सोपवाव्यात व सदर पृष्ठे सचिवांकडील साक्षांकीत केलेल्या नस्तीस जोडण्यात यावीत.

४) सदर कागदपत्रांचे साक्षांकन केलेल्या अधिका-यांच्या स्वाक्ष-या संबंधीत विभागाच्या सचिवांनी वेळोवेळी प्रमाणित करून त्याची नोंद निर्देशपत्रावर घ्यावी.

५) एखादया नस्तीवर कार्यवाही पूर्ण झाल्यानंतर सदर नस्ती पुनश्च स्कॅन करून त्याची सॉफ्ट कॉपी विभागाच्या सचिवांकडे सूपूर्द करण्यात यावी व नस्ती विभागाच्या सचिवांच्या मान्यतेने सर्वसाधारण कार्यपध्दतीनुसार दफ्तरी दाखल करावी.

६) क्षेत्रीय स्तरावरील कार्यालयांमधील संबंधीत नस्त्या/कागदपत्रे संबंधीत कार्यालय प्रमुखांनी साक्षांकीत करून संबंधीत प्रशासकीय विभागाच्या सचिवांकडे उपरोक्त नमुद कार्यपध्दतीप्रमाणे सूपूर्द करावी. वरील सर्व संबंधित अधिकारी व कर्मचा-यांनी काटेकोरपणे पालन करावे. तसेच संबंधीत विभागीय सचिवांनी सदर अंमलबजावणीचा वेळोवेळी आढावा घ्यावा.

(कृ.मा.प.)

हे परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०११०९०२१४१२३७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(के. पी. बक्षी)**
**प्रधान सचिव (सेवा), महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,

२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,

३. मा. गृहमंत्री यांचे खाजगी सचिव,

४. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक,

५. सर्व अपर मुख्य सचिव, प्रधान सचिव, सचिव, मंत्रालय, मुंबई,

यांना असे सुचित करण्यात येते की त्यांनी सदर परिपत्रकातील सूचना त्यांच्या विभागाच्या अधिनस्त असलेल्या कार्यालयांच्या निदर्शनास आणाव्यात व या संदर्भातील अंमलबजावणीबाबतही वेळोवेळी आढावा घ्यावा.

६. सामान्य प्रशासन विभाग/ कार्यासन - १०,१०/अ, मंत्रालय, मुंबई,

७. निवड नस्ती .